राष्ट्रीय ग्रामिण पेयजल कार्यक्रम (NRDWP)
भूजल उपलब्धतेत सातत्य व सुरक्षितता
**(Sustainability & Safety of Sources)**
आणण्याकरिता पाणी टंचाई प्रतिबंधात्मक उपाययोजना

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्र. ग्रापापु १००९/प्र. क्र. २०४/पापु-१५**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,**
**दिनांक- १३ ऑगस्ट, २००९.**

**वाचा -** १) शासन निर्णय, पा.पु. व स्व. वि. क्र. टंचाई-१०९९/प्र.क्र. -१२/पापु-१४ दि. ३ फेब्रुवारी १९९९
२) शासन निर्णय, पा.पु. व स्व. विभाग क्र. टंचाई-१००७/प्रक्र-१९७/पापु-१४ दिनांक २७ फेब्रुवारी २००८

**प्रस्तावनाः -**

राज्यातील सुमारे ८०% पेयजलाचे स्त्रोत भूजलावर आधारीत आहेत. राज्यातील अपूरे पर्जन्यमान, कठीण भूस्तरीय रचना, काही भागांत सिंचनासाठी होणारा भूजलाचा अति उपसा यामूळे उन्हाळयात भूजलाची पातळी खाली जाऊन पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण होते. त्या अनुषंगाने पिण्याच्या पाण्याचे स्त्रोत बळकट व संरक्षित करुन संभाव्य पाणी टंचाईवर प्रभावीपणे मात करण्यासाठी शासनाने दिनांक २७ फेब्रुवारी, २००८ रोजी घेतलेल्या धोरणात्मक निर्णयानुसार राज्यात पाणी टंचाई प्रतिबंधात्मक उपाययोजना म्हणून स्त्रोत बळकटीकरणाच्या उपाययोजना राबविण्यास काही अंशी सुरवात करण्यात आलेली आहे. या उपाययोजनामुळे संभाव्य पाणी टंचाईवर मात करण्यासाठी चांगला फायदा होणार असून परिणाम स्वरुप पाणी पुरवठ्यासाठीचे टॅंकर देखील बंद करण्यात शासनाला यश लाभू शकेल.

केंद्र शासनाच्या **राष्ट्रीय ग्रामिण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक तत्वानुसार** (NRDWP) भूजलाधारित स्त्रोत शाश्वत (Sustainable) व सुरक्षित ठेवण्याकरीता

विविध तांत्रिक घटकांचा अभ्यास करणे आवश्यक आहे. शाश्वततेचे सर्वच घटक भूस्तर, पर्जन्यमान, हवामान व भूजलशास्त्राशी निगडीत आहेत. त्यामुळे सदर कार्यक्रमामध्ये भूवैज्ञानिक यांचा सहभाग अनिवार्य आहे. तसेच, प्रस्तावित उपाययोजनांची प्राकलने व आराखडे तयार करणे व योजना राबविणेसाठी स्थापत्य अभियंता यांची देखील आवश्यकता लागणार आहे.

केंद्र शासनाच्या नवीन धोरणानुसार पाणी पुरवठा योजनेमध्ये निर्णय प्रक्रियेत लोकांचा सहभाग आवश्यक असून गावातील भूजलाबाबत लोकांना माहिती असणे आवश्यक आहे. जेणेकरुन, गावातील भूजल उपलब्धता व त्या विषयीच्या समस्या लोकांना समजून येतील व ते निर्णय प्रक्रियेमध्ये पुर्णपणे भाग घेऊ शकतील. हे काम माहिती, शिक्षण व संवाद तज्ञ (IEC तज्ञ) चांगल्या प्रकारे करु शकतील. त्यामुळे त्यांचा देखील सहभाग या कार्यक्रमात घेणे अपेक्षित आहे.

अशा प्रकारे केंद्र शासनाच्या NRDWP च्या नवीन मार्गदर्शक सूचनांनुसार सर्व बाबी साकल्याने विचारात घेऊन टंचाई प्रतिबंधात्मक उपाययोजनांचा कार्यक्रम राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

अस्तित्वातील भूजलावर आधारीत पेयजल पाणी पुरवठा योजनांमधून शाश्वतरित्या पाणी उपलब्ध व्हावे यासाठी पिण्याच्या पाण्याचे स्त्रोत बळकटीकरण करणेकरीता भूजल सर्वेक्षण करणे, IEC करणे व पारंपारिक व अपारंपारिक उपाययोजनांची प्राकलने व आराखडे तयार करुन उपाययोजनांच्या अंमलबजावणीमध्ये पर्यवेक्षण ही कामे Turn Key Project basis वर करण्यासाठी **तांत्रिक सेवा पुरवठादार** यांच्या सेवा घेण्यास व पुढील उपाययोजना राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१. अ) घ्यावयाच्या उपाय योजना

i. पिण्याच्या पाण्याच्या योजनेतील सार्वजनिक स्त्रोतांच्या वरील बाजूच्या परिसरात पावसाचे पाणी साठवुन पावसाळ्यानंतरच्या कालवधीत त्याचा फायदा स्रोतातील भूजल वृध्दीसाठी होणार आहे, अशा सर्व प्रकारच्या पारंपारिक जलसंधारणाच्या उपाययोजना.

ii. भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेने विकसित केलेल्या अपारंपारिक उपाययोजना उदा. जॅकेटवेल, विंधन विहीर विस्फोट तंत्र, फ्रॅक्चर सिल सिमेंटेशन, नालातळ विस्फोट तंत्र, विहिरीं/विंधन विहिरीव्दारे भूजलाचे कृत्रिमरित्या पुनर्भरण उपाययोजना, रिचार्ज शॅफ्ट इत्यादी.

iii. गावातील सार्वजनिक, खाजगी तसेच शासकीय इमारतींवर पडणारे पावसाचे पाणी संकलित व स्वच्छ करून **"छतावरील पाऊस पाणी संवर्धन "** पध्दतीने ते पेयजल स्रोतात अथवा खाजगी विहीरी/विंधण विहीरींमध्ये जिरविणे साठी आवश्यक उपाययोजना.

iv. इतर पारंपारिक उपाययोजना की, ज्यामुळे पेयजल स्रोतातील भूजल उपलब्धतेत वाढ होऊ शकेल (उदा. विहिरीतील गाळ काढणे/खोली वाढविणे/पाझर तलावातील गाळ काढणे) इत्यादीं सारख्या पारंपारिक उपाययोजना.

v. याशिवाय, स्थानिक परिस्थितीनुरुप पेयजल स्रोतातील भूजल वाढीसाठी स्थानिक ज्ञानावर आधारित शास्त्रीय व तांत्रिकदृष्टया शक्य असणा-या नावीन्यपूर्ण उपाययोजना.

**ब) गाव निवडीचे निकष**

**i.** राज्यात प्रत्येक जिल्हयातील पाणी टंचाईग्रस्त गावे निवडण्यात येतील.

ii. गावे निवडतांना संबंधित जिल्हयातील ज्या गावांना टॅंकरने पाणी पुरवठा करावा लागला आहे किंवा ज्या गावे/वाडयात संभाव्य पाणी टंचाई निवारणार्थ उपाययोजना प्रस्तावित करण्यात आल्या परंतु अंमलबजावणी करता आलेली नाही किंवा भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या संभाव्य पाणी टंचाई अहवालानुसार ज्या गावातील भूजल पातळीत अमूलाग्र घट झाल्याचे आढळून आलेले असेल अशा गावांना प्राधान्य देण्यात यावे.

iii. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यांचे अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीमार्फत गावांची निवड करण्यात येईल. सदर समितीची रचना व कार्यपध्दती **जोडपत्र ३** मध्ये देण्यात आली आहे. सदर समितीमार्फत निवडण्यात आलेल्या गावांना जिल्हाधिकारी यांची मंजूरी घेणे आवश्यक आहे.

**क) कार्यक्रम राबविण्यासाठी मार्गदर्शक सुचना**

सदर योजना दोन टप्प्यात राबवावयाची असून ते पुढील प्रमाणे आहेत.

**टप्पा १ - कृती आराखडा (Detailed Project Report-DPR)**

i. निवडलेल्या गावांमध्ये पेयजल स्त्रोत बळकट करणेसाठी आवश्यक जनजागृती, भूजल सर्वेक्षण व प्रस्तावित उपाययोजनांची प्राकलने व आराखडे यांचा समावेश असलेला DPR तयार करावयाचा आहे.

ii. भूवैज्ञानिक, स्थापत्य अभियंता व जनजागृती करण्यासाठी माहिती, शिक्षण व संवाद तज्ञ (IEC Expert) यांचा समावेश असलेल्या **तांत्रिक सेवा पुरवठादार संस्थेकडून DPR करुन घेण्यात यावा.** कंत्राटी पध्दतीने तांत्रिक सेवा पुरवठादार लावण्याची पध्दत **जोडपत्र** १ मध्ये नमुद केलेली आहे.

iii. तांत्रिक सेवा पुरवठादार संस्थेने **जोडपत्र** २ मध्ये नमुद केलेल्या कार्यप्रणालीचा अवलंब करुन DPR तयार करुन जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक यांना सादर करावयाचा आहे.

iv. जलसंधारण उपाययोजनांतर्गत घ्यावयाच्या कामांची प्राकलने व आराखड्याला कार्यकारी अभियंता, ग्रामिण पाणी पुरवठा/लघु पाटबंधारे, जिल्हा परिषद हे तांत्रिक मान्यता देतील. तसेच अपारंपारीक व कृत्रिमरित्या जलपुनर्भरणाच्या उपाययोजनांना जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक तांत्रिक मान्यता देतील.

v. जिल्हास्तरीय समितीपुढे तांत्रिक मान्यता प्राप्त झालेले अहवाल व अंदाजपत्रक प्रस्तुत करण्यात येवून त्यास समिती एकाच बैठकीत **प्रशासकीय व आर्थिक मान्यता** प्रदान करेल.

**टप्पा २ - अंमलबजावणीची कार्यपध्दती .**

१) कृती आराखडा तयार करुन घेण्यासाठी नेमण्यात आलेल्या तांत्रिक सेवा पुरवठादारानेच स्थापत्य व इतर कामांच्या अंमलबजावणी अंतर्गत पर्यवेक्षण, गुणवत्ता सनियंत्रण आदि कामांची देखील जबाबदारी पार पाडावयाची आहे. या तांत्रिक सेवा पुरवठादाराने करावयाच्या कामांची माहिती **जोडपत्र १** मध्ये नमुद केली आहे. सुरुवातीस, सदर योजना प्रायोगिक तत्वावर औरंगाबाद, जालना, बीड, परभणी हिंगोली, लातूर, उस्मानाबाद,नांदेड, यवतमाळ व चंद्रपूर या एकूण १० टंचाईग्रस्त जिल्ह्यामध्ये राबविण्यात येईल.

२) **लोकवर्गणी-** सदर कार्यक्रम टंचाईअंतर्गत राबविण्यात येणार असल्याने राज्यात या योजनेच्या अंमलबजावणीसाठी लोकवर्गणीची अट असणार नाही.

३) **निधी -** या योजनेंतर्गत केंद्र शासनाकडुन प्रत्यक्ष कामांच्या अंमलबजावणीसाठी व सहाय्यकारी सेवेसाठी निधी प्राप्त होणार असुन त्याचा तपशील **जोडपत्र ५** मध्ये नमुद करण्यात आलेला आहे. पेयजल स्त्रोत बळकटीकरण कामांसाठी प्रति ग्रामपंचायत रुपये १२.०० लाख इतकी कमाल मर्यादा निश्चित करण्यात येत आहे. या मर्यादेपेक्षा जास्त खर्चाच्या योजनांना समितीने मान्यता देऊ नये.

४) **अनुदान वितरण कार्यप्रणाली-** या योजने अंतर्गत सर्व अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना शासनामार्फत उपलब्ध करून दिले जाईल. त्याकरिता संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना राष्ट्रीयकृत बँकेत नवीन बचत खाते उघडणेस मान्यता देण्यात येत आहे. जिल्हा समितीने मंजूर केलेल्या कामांना आवश्यक असलेल्या अनुदानाची मागणी जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक यांनी विभागीय उपसंचालकांमार्फत सादर केल्यानंतर संचालकांकडून संबंधित जिल्हयांना अनुदान वर्ग करण्यात येईल. जिल्हा समिती ह्याच अनुदानातून तांत्रिक सेवा पुरवठादारास देय असलेल्या रक्कमेची अदायगी करील.

सहाय्यक सेवा अंतर्गत प्राप्त झालेले अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे हे विभागीय उपसंचालक यांचेकडे वर्ग करतील. या अनुदानातून जनजागृती साहित्य तयार करणे व तांत्रिक सेवा पुरवठादारांकडील तज्ञ व सहाय्यक सेवा देणा-या व्यक्तिंना प्रशिक्षण देणे, गाडया भाडयाने लावणे इ. कामे करावीत.

**५) प्रशिक्षण -** तांत्रिक सेवा पुरवठादार संस्थेतील तज्ञ व सहाय्यकारी सेवा पुरविणारे सहाय्यक यांना प्रत्यक्ष काम सुरु करण्यापूर्वी या योजनेचे स्वरुप व कार्यप्रणाली अवगत करुन देणे आवश्यक आहे. यासाठी सर्व संबंधितांना विभागीय उपसंचालकांचे स्तरावर एक दिवसीय प्रशिक्षण (Orientation Training) देण्यात येईल. त्यासाठी प्रती प्रशिक्षणार्थी रुपये ५००/- इतके कमाल अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे मार्फत उपलब्ध करुन दिले जाईल.

**६) जनजागृती प्रचार साहित्य -** निवडलेल्या गावांत एकूण पडणारा पाऊस तसेच भूजल पातळीची माहिती गावक-यांना असणे आवश्यक आहे. त्याकरिता प्रत्येक ग्रामपंचायतीमध्ये पाऊस मोजण्याकरिता एक पर्जन्यमापक बसविणे गरजेचे असणार आहे. पर्जन्यमापकांच्या खरेदीची कार्यवाही संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी विहित केलेल्या कार्यप्रणाली नुसार विभागीय उपसंचालक करतील. यासाठीचे अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे मार्फत उपलब्ध करुन दिले जाईल. या व्यतिरिक्त लोकांमध्ये जलजागृती करणेसाठी प्रचार साहित्याची आवश्यकता लागणार आहे. त्यासाठी भित्तीपत्रक, प्रतिकृती (Models), घडीपत्रिका, जाहीराती इत्यादी माध्यमांची मदत घेण्यात यावी. या सर्व कामांसाठी प्रत्येक ग्रामपंचायतीसाठी रुपये १०,०००/- इतके कमाल अनुदान देय असेल.

**७) ध्येय -** तांत्रिक सेवा पुरवठादाराने माहिती, शिक्षण व संवाद तज्ञ, भूवैज्ञानिक व स्थापत्य अभियंता यांचेमार्फत त्यांना दिलेल्या गावांमध्ये जलजागृती करणे, भूजल शास्त्रीय सर्वेक्षण

करून स्त्रोत बळकटीकरण उपाययोजना सुचविणे, प्रस्तावित उपाययोजनांची प्राकलने व आराखडे तयार करून त्यांसह वरील कामांचा DPR तयार करुन जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिकास सादर करणे आवश्यक आहे. याकरिता व टंचाईग्रस्त गावांचे उपलब्धतेनुसार संबंधित तांत्रिक सेवा पुरवठादार एकापेक्षा जास्त चमुच्या सेवा घेवु शकतील.

**८) वाहने उपलब्धता -** या योजनेंतर्गत संनियंत्रणाची कामे करण्यासाठी प्रत्येक जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक/विभागीय उपसंचालक/संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या कार्यालयांना प्रतिवर्षीच्या कालावधीकरिता **एक** वाहन भाड्याने लावता येईल. सदर वाहनाच्या भाड्यापोटी दरमहा रुपये ३०,०००/- प्रति वाहन या मर्यादेत खर्च करता येईल.

**९) वार्षिक नियोजन -** योजनेतर्गंत दरवर्षी करावयाच्या कामांचा माहवार तपशील **जोडपत्र ४** मध्ये नमुद करण्यात आलेला आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २००९०८१३११४७२६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**आपला,**

**(अजितकुमार जैन)**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

## <u>जोडपत्र १</u>

**तांत्रिक सेवा पुरवठादार यांची निवड पध्दत, करावयाची कामे व सेवेसाठीचे मानधन**

तांत्रिक सेवा पुरवठादार संस्थेच्या चमूमध्ये भूवैज्ञानिक, स्थापत्य अभियंता व माहिती, शिक्षण व संवाद तज्ज्ञ (IEC तज्ज्ञ) असे तज्ज्ञ आवश्यक असतील. कामांच्या व्याप्तीप्रमाणे चमुंच्या संख्येत तांत्रिक सेवा पुरवठादाराने वाढ करावी.

(१) तांत्रिक सेवा पुरवठादाराचे चमूमधील वरील व्यक्तींकडे पुढील प्रमाणे **शैक्षणिक अर्हता व अनुभव** असणे आवश्यक आहे-

अ) **भूवैज्ञानिक (किमान १)** - M.Sc. (Geology) तसेच ग्रामीण पाणी पुरवठा, पाणलोट क्षेत्र विकास व भूजल पुनर्भरण क्षेत्रातील किमान ५ वर्षाचा अनुभव असणे आवश्यक राहील. राज्यातील भूस्तराचा अभ्यास असणे आवश्यक.

**ब) स्थापत्य अभियंता (किमान २) -** स्थापत्य अभियांत्रिकी शाखेतील पदवीधारक व पेयजल योजना, पाणलोट क्षेत्र इत्यादी कार्यक्रमातील किमान ५ वर्षाचा क्षेत्रीय कामाचा अनुभव असणे आवश्यक. त्यामध्ये प्राकलने व आराखडे तयार करणे, Lay Out देणे व पर्यवेक्षण करणे इ. कामाचा अनुभव आवश्यक आहे.

**क)** माहिती, शिक्षण व संवाद तज्ज्ञ **(IEC तज्ज्ञ-किमान १) -** समाजशास्त्र पदवीधर व ग्रामीण भागातील IEC कामाचा किमान ५ वर्षाचा अनुभव असणे आवश्यक. (MSW प्राधान्य ). योग्य ती शैक्षणिक अर्हता व अनुभव असलेल्या महिलांना प्राधान्याने घेणे आवश्यक.

**ड)** याशिवाय तांत्रिक सेवा पुरवठादारास योजनेंतर्गत करावयाच्या कामांसाठी आवश्यक असणारा supporting staff जसे की, सर्वेअर , पर्यवेक्षक, मदतनीस इत्यादि पुरेशा संख्येने असणे आवश्यक.

(२) **निवड पध्दत** :- जिल्हा स्तरीय समितीमार्फत वरीलप्रमाणे शैक्षणिक अर्हता व अनुभवानुसार स्थानिक वर्तमानपत्रात जाहिरात देऊन तांत्रिक सेवा पुरवठादार यांचे इच्छापत्र (Expression of Interest-EOI) मागविण्यात यावेत व त्यानंतर त्यांची शैक्षणिक अर्हता व अनुभवानुसार निवड करण्यात यावी. निवड प्रक्रियेस येणारा खर्च योजनेच्या सहाय्यकारी अनुदानातून भागविण्यात यावा.

तांत्रिक सेवा पुरवठादाराची सेवा **एक** वर्षासाठी असेल व त्यांनी केलेल्या कामाच्या गुणवत्तेच्या व मुल्यमापनाचे आधारावरच जिल्हा समिती मुदत वाढीचा अथवा सेवा समाप्त करण्याचा निर्णय घेईल व तो सेवा पुरवठादारास बंधनकारक असेल. तांत्रिक सेवा पुरवठादाराने जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा यांचेशी कामासाठी सहमती करारनामा (MoU) करावा. सदरील करारनाम्यामध्ये तांत्रिक सेवा पुरवठादार यांनी करावयाच्या कामासंदर्भात व त्यांना देय असलेल्या मानधनाचे संदर्भात आवश्यक त्या अटी व शर्तींचा समावेश असेल. तांत्रिक सेवा पुरवठादार हे जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिकांना केलेल्या कामाचा अहवाल सादर करतील व त्यांच्या सुचनांनुसार कामे करतील.

**(३) तांत्रिक सेवा पुरवठादाराने करावयाची कामे -**

१) जोडपत्र - २ मध्ये नमुद केल्याप्रमाणे Detailed Project Report (DPR) तयार करणे.

२) जिल्हा समितीची मंजूरी प्राप्त झालेल्या प्राकलने व आराखड्यानुसार सेवा पुरवठादाराकडील स्थापत्य अभियंता यांनी Lay Out आखून देणे.

३) जिल्हा समितीमार्फत उपाययोजनांच्या अंमलबजावणीसाठी निविदा प्रक्रियेद्वारे अंतिम करण्यात आलेली यंत्रणा/कंत्राटदार यांच्या मदतीने प्रत्यक्ष अंमलबजावणी सुरु करणे.

४) कामांच्या प्रत्यक्ष अंमलबजावणी दरम्यान पर्यवेक्षण व आवश्यकतेनुसार तांत्रिक मार्गदर्शन करुन कामे गतीने विहीत कालमर्यादेत पुर्ण करणे.

५) झालेल्या कामांची मोजमापे घेवुन त्याच्या नोंदी नोंदवहीत घेणे. आवश्यक असलेल्या विविध प्रकारच्या नोंदवह्या व त्यात ठेवावयाच्या नोंदी अद्ययावत ठेवणे.

६) झालेल्या कामांच्या मोजमापानुसार Running Bills कंत्राटदार /ठेकेदार /पुरवठादार यांचेकडून प्राप्त करुन घेवुन तपासणी अंती प्रतिस्वाक्षरीसह देयकांची अदायगी करणेसाठी जिल्हा समितीस सादर करणे व काम पूर्ण झाल्यानंतर ते पूर्ण झाल्याचे प्रमाणपत्र (Completion Certificate) देणे. ठेकेदारास/ कंत्राटदारास /पुरवठादारास अदा करावयाच्या देयकांच्या नोंदी ठेवणे.

७) उपाययोजनांची कामे पूर्ण झाल्यावर Impact Assessment करणे. त्या आधारावर पूर्ण झालेल्या योजनांचे फलश्रुती अहवाल तयार करणे. यामध्ये संबंधित योजना यशस्वी अथवा अयशस्वी ठरल्यास त्यासाठी कारणीभूत ठरलेल्या महत्वाच्या घटकांचा / बाबींचा कारणमिमांसेसह अहवाल तांत्रिक सेवा पुरवठादार यांनी जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिकांना सादर करणे.

**(४) सहाय्यक सेवा -** जिल्हा स्तरावर या योजनेचे नियोजन व सनियंत्रण सुयोग्य पध्दतीने व विहित वेळेत करता यावे यासाठी प्रत्येक जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक कार्यालय, विभागीय उपसंचालक कार्यालय व संचालनालयासाठी **एक लेखापाल व एक डेटा एंट्री ऑपरेटर** अशा दोन व्यक्तींच्या सेवा संबंधित तांत्रिक सेवा पुरवठादाराकडून कंत्राटी पध्दतीने घेणेकरीता मान्यता देणेत येत आहे. विभागीय कार्यालय व संचालनालयाचे मुख्यालय असलेल्या ठिकाणच्या जिल्हा कार्यालयाकडे कार्यरत असणाऱ्या तांत्रिक सेवा पुरवठादाराने संबंधित विभागीय कार्यालय व संचालनालयास या दोन व्यक्ती उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील. या योजनेंतर्गत सहाय्यकारी सेवे अंतर्गत तांत्रिक सेवा पुरवठादारास जिल्हा स्तरावर प्राप्त होणारे अनुदान, त्यांचे टप्पेनिहाय वाटप, लेखे, हिशोब, नोंदवह्या ठेवणे तसेच

लेखा परिक्षण, माहिती संकलन, पत्रव्यवहार, डेटा व माहितीचे संगणकीकरण, विविध विवरणपत्रामध्ये माहिती तयार करुन सादर करणे, तसेच नव्याने निर्माण केलेल्या जिल्हा स्तरीय पाणी पुरवठा व स्वच्छता समिती  समवेत समन्वय ठेवणे इत्यादी कामे करावी लागणार आहेत.

**(५) मानधन -** तांत्रिक सेवा पुरवठादारांना गावातील स्त्रोत बळकट करण्यासाठी वरील मुद्दा क्र. ३ मध्ये नमुद केल्याप्रमाणे आवश्यक IEC करणे, भूजल सर्वेक्षण व प्रस्तावित उपाययोजनांची प्राकलने वआराखडे यांचा समावेश असलेला गावाचा DPR तयार करणे, उपाय योजनांचा अंमलबजावणीदरम्यान पर्यवेक्षण करणे, इत्यादी सर्व कामे करावी लागणार आहेत. त्याकरिता तांत्रिक सेवा पुरवठादार यांना प्रति ग्राम पंचायत रुपये ७५,०००/- अथवा समितीने मंजूर केलेल्या उपाययोजनाच्या अंदाजित किंमतीच्या ७ % रक्कम यापैकी जी रक्कम कमी असेल ती रक्कम देय राहील. या देय रकमेमध्ये वाहन, सहाय्यक कर्मचा-यांवरील व इतर सर्व खर्चाचा समावेश राहील. उपरोक्त देय मानधनापेक्षा इतर कोणतीही रक्कम तांत्रिक सेवा पुरवठादारांना देय असणार नाही.

तांत्रिक सेवा पुरवठादाराचे कामांच्या देयकांची अदायगी तीन टप्प्यात जिल्हास्तरीय समितीच्या मान्यतेअंती समितीचे **अध्यक्ष व सदस्य सचिव यांचे संयुक्त स्वाक्षरीने धनादेशाद्वारे** केली जाईल.

संबंधित तांत्रिक सेवा पुरवठादाराने DPR सादर केल्यानंतर त्यांना देय असलेल्या रक्कमेपैकी १ % रक्कम अदा करण्यात येईल. उर्वरीत रक्कमेपैकी १ % रक्कम प्राकलने व आराखड्यांना जिल्हा समितीने प्रशासकीय व आर्थिक मंजूरी दिल्यानंतर अदा करण्यात येईल. उपाययोजनांच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीच्या टप्प्यामध्ये तांत्रिक सेवा पुरवठादारास देय असलेल्या रक्कमेपैकी उपाययोजनांचे काम प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर ४% रक्कम जिल्हा स्तरीय समितीच्या मान्यतेअंती अदा केली जाईल. सर्व कामे पूर्ण झाल्यावर पुढील

पावसाळ्यानंतर झालेली कामे योग्य असल्याची खात्री करुन, उर्वरीत १% रक्कम तांत्रिक सेवा पुरवठादार यांना जिल्हा समितीच्या मान्यतेअंती अदा केली जाईल.

सहाय्यक सेवेकरीता एका कार्यालयासाठी उपलेखापाल व डेटा एंट्री ऑपरेटर या दोन व्यक्तिंकरिता दरमहा एकूण रुपये ३५,०००/- संबंधित सेवा पुरविणाऱ्या तांत्रिक सेवा पुरवठादारास देय राहिल. संबंधित तांत्रिक सेवा पुरवठादारास ही रक्कम दरमहा अदा करण्यात येईल. या कंत्राटी सेवेसाठी होणारा मानधनावरील खर्च या योजनेंतर्गत केंद्र शासनाकडुन वेगळ्याने प्राप्त होणाऱ्या सहाय्यकारी अनुदानातून करण्यात येईल.

## जोडपत्र २

## DPR तयार करणेसाठीची कार्यप्रणाली

१. जिल्हा समितीने निवडलेल्या गावात तांत्रिक सेवा पुरवठादारामार्फत प्रत्यक्ष सर्वेक्षण सुरु करण्यापूर्वी गावात ग्रामसभा घेवून जलजागृती करण्यात यावी. ग्रामसहभागीय मुल्यावलोकन कार्यप्रणालीचा (PRA) अवलंब करुन गावातील सर्व सार्वजनिक व खाजगी जलस्त्रोतांची माहिती संकलित करावी. गावातील पाण्याचा व विशेषत्वाने पिण्याच्या पाण्याच्या सर्व माहितीचा समावेश असावा.

२. तांत्रिक सेवा पुरवठादाराने गावांतील सर्व पेयजल स्त्रोतांचे भूजल सर्वेक्षण करुन बळकटीकरण करणे आवश्यक असलेल्या स्त्रोत परिसराचे संपूर्ण सखोल भूजलशास्त्रीय सर्वेक्षण करावयाचे आहे. पेयजल स्त्रोत संरक्षित करण्यासाठी स्त्रोतापासून किमान ५०० मीटर परिसरातील १००% विहिरी व विंधण विहिरींची तपासणी करुन सखोल भूजलशास्त्रीय अहवाल तयार करावयाचा आहे. सदर अहवालामध्ये क्षमता चाचणी, लाव्हा फ्लोजची संख्या , Specific Yield, १० वर्षातील पर्जन्यमानाचे स्वरुप व तीव्रता, भूभौतिक सर्वेक्षण, सुदूर संवेदन अहवाल, इत्यादीचा अतर्भाव करावा. त्यात तांत्रिक तपशिलासह स्त्रोत बळकटीकरणासाठी स्थळ सापेक्ष पारंपारीक व अपारंपारीक उपाययोजनांची शिफारस करावयाची आहे. स्त्रोताच्या तांत्रिक मुल्यमापना सोबत गुणवत्तेचा तपशिल देखील अहवालात समाविष्ट करावयाचा आहे. या सर्व बाबी गांव नकाशावर दर्शविणे अनिवार्य असणार आहे.

तांत्रिक सेवा पुरवठादाराने तयार करावयाच्या DPR (Detailed Project Report) मध्ये खालील बाबींचा समावेश करावा.

अ) १)ग्रामसहभागीय मुल्यावलोकन कार्यप्रणालीचा (PRA) अवलंब करुन प्राप्त झालेली माहिती.

२) संबंधित गावातील अस्तित्वातील पेयजल साधनांची / योजनांची माहिती.

३) अस्तित्वातील भूपृष्ठीय पाणी साठयांबाबतची माहिती.

४) गावातील पाण्याचा ताळेबंद.

५) भूवैज्ञानिकांनी केलेल्या भूजल सर्वेक्षण कामाचा अहवाल.

६) गावातील मागील १० वर्षाचे पर्जन्यमानाचा पॅटर्न व ट्रेंड.

७) Soil moisture, evaporation इ.बाबत माहिती.

८) गावातील उन्हाळ्यातील / हिवाळ्यातील भूजल उपलब्धता.

९) पाण्याची गुणवत्ता.

१०) भूजल सर्वेक्षणाचे आधारे शिफारस करण्यात आलेल्या स्रोत बळकटीकरण उपाययोजनांची माहिती.

ब) शिफारस करण्यात आलेल्या स्रोत बळकटीकरण उपाययोजनांची प्राकलने व आराखडे.

क) शिफारस केलेल्या उपाययोजना राबविल्याने भूजल उपलब्धतेत होणा-या संभाव्य वाढीबाबतची माहिती.

३. काही कारणास्तव फेर सर्वेक्षण करणे आवश्यक झाल्यास त्यासाठी संबंधित तांत्रिक सेवा पुरवठादारास वेगळ्याने निधी दिला जाणार नाही.

४. वरिष्ठ भूवैज्ञानिकांच्या मान्यतेनंतर तांत्रिक सेवा पुरवठादार प्रस्तावित कामांचे तपशीलवार प्राकलने व आराखडे तयार करतील. प्राकलने व आराखडे तयार करण्यासह DPR तयार करणे व अंमलबजावणीच्या पर्यवेक्षणासाठी योजनेच्या एकूण अंदाजित खर्चाच्या ७% रक्कमेचा अंतर्भाव प्राकलने व आराखड्यामध्ये करणे आवश्यक आहे.

५. अपारंपारिक व जलपुनर्भरण उपाययोजनांच्या प्राकलने व आराखडे यांना जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक तर जलसंधारणाच्या उपाययोजनांना कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा / लघुपाटबंधारे जिल्हा परिषद यांची तांत्रिक मान्यता घ्यावी.

६. जिल्हा समितीच्या प्रशासकीय व आर्थिक मान्यतेनंतर उपाययोजना राबविण्याचे काम ठेकेदारामार्फत करण्यात येईल. ठेकेदारांच्या निवडीसाठी आवश्यक निविदा प्रक्रिया पार

पाडणेकरिता तांत्रिक सेवा पुरवठादार जिल्हा समितीस सर्व मदत करतील. तसेच प्राप्त निविदा जिल्हास्तरीय समितीपुढे ठेवून त्याची छाननी करुन घेण्यास मदत करतील. निवड झालेल्या ठेकेदारास जिल्हा समिती कामाचे आदेश देईल.

## जोडपत्र ३

## जिल्हा स्तरीय समिती - रचना व कार्यपध्दती

या योजनेची जिल्ह्यात प्रभावी व योग्य पध्दतीने अंमलबजावणी करता यावी या साठी गठित करण्यात आलेल्या समितीची रचना खालील प्रमाणे असणार आहे.

| | |
|---|---|
| १. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, | अध्यक्ष |
| २. उपजिल्हाधिकारी (टंचाई ) | सदस्य |
| ३. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जि.प. | सदस्य |
| ४. कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे विभाग, जि.प. | सदस्य |
| ५. केंद्र शासनाच्या निर्देशानुसार नेमली जाणारी जिल्हास्तरीय पाणी पुरवठा व स्वच्छता समिती प्रमुख | सदस्य |
| ६. जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भू.स.वि.यं. | सदस्य सचिव |

**कार्यकक्षा:-**

- गांव निवडीची प्रक्रीया पूर्ण करुन त्यास जिल्हाधीकारी यांची मान्यता घेणे.
- तांत्रिक सेवा पुरवठादाराची निवड प्रक्रीया पुर्ण करणे.
- तांत्रिक मंजूरी देण्यात आलेल्या गावांना/उपाययोजनांना प्रशासकीय व आर्थिक मंजूरी देणे.
- कामांच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीसाठी कंत्राटदारांची निविदा पध्दतीने निवड करुन त्यांना कामांचे आदेश देणे.

- शासन व संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचेकडून प्राप्त होणा-या सूचनांनुसार भूजल योजनेची जिल्ह्यात काटेकोरपणे अंमलबजावणी करणे व त्याचे सनियंत्रण करणे.
- तांत्रिक सेवा पुरवठादार व कंत्राटदारांमार्फत होणा-या कामांची देयके अदा करणेस समितीने मान्यता देणे व समितीचे अध्यक्ष व सदस्य सचिव यांचे संयुक्त स्वाक्षरीने धनादेशाव्दारे देयकांची अदायगी करणे.
- कंत्राटदारामार्फत केलेल्या कामाची देयके जिल्हा समिती ४ Running Bills मध्ये अदा करील.
- दरमहा अथवा आवश्यकतेनुसार बैठक घेण्यात येऊन त्यात प्रस्तावित व झालेल्या कामांचा आढावा घेणे

**जोडपत्र ४**

**वार्षिक नियोजन**

- मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीने योजनेची  अंमलबजावणी करण्यासाठी विहीत निकषानुसार गावांची निवड करणे, तांत्रिक सेवा पुरवठादार यांची निवड करणे - **जुलै अखेर**
- तांत्रिक सेवा पुरवठादारा मार्फत DPR तयार करणेसाठी आवश्यक क्षेत्रिय कामांना सुरवात - **१ ऑगस्ट**
- उपाययोजनांची प्राकलने व आराखडे जस जसे तयार होतील त्याप्रमाणे स्थापत्य कामांना कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा/ लघु पाटबंधारे,  जिल्हा परिषद यांचेकडून व अपारंपारिक व जलपुनर्भरण कामांना वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूसवियं यांचेकडून तांत्रिक मान्यता व जिल्हा समितीची प्रशासकीय व आर्थिक मान्यता घेणे - **ऑगस्ट पासुन**
- प्रत्यक्ष कामांच्या अंमलबजावणीची प्रक्रीया सुरु करणे. (मार्च पर्यंत देण्यात आलेले कामाच्या आदेशांचे कार्यान्वयन पावसाळ्या पुर्वी म्हणजे जुन अखेर करणे बंधनकारक असेल)

**जोडपत्र ५**

**अनुदानाचा तपशील, बाबनिहाय मर्यादा व संभाव्य वित्तीय भार**

| | |
|---|---|
| **अंमलबजावणी निधीमधून**<br>**अंमलबजावणी**<br><br>**अ) उपाययोजना किंमत**<br>रु.१२.०० लक्ष x ५० ग्रामपंचायती x१० जिल्हे<br><br>**ब)** प्रत्येक जिल्हयासाठी योजनेचा DPR तयार करणे, अंमलबजावणीअंतर्गत पर्यवेक्षण व इतर अनुषंगिक कामे यावरील खर्च<br>प्रति ग्रा.पं. उपाय योजनांचा एकूण अंदाजित खर्च रुपये १२.०० लक्षच्या ७% = रू. ०.८४ लक्ष<br>एकूण ५० ग्रा.पं. x १० जिल्हे x रु. ०.८४ लक्ष<br><br>**क)** प्रत्येक जिल्हयासाठी योजनेचा DPR तयार करणेवरील खर्च<br>प्रति ग्रा.पं. उपाय योजनांचा एकूण अंदाजित खर्च रुपये १२.०० लक्षच्या २ % = रू. ०.२४ लक्ष<br>एकूण ५० ग्रा.पं. x १० जिल्हे x रु. ०.२४ लक्ष | **रूपये लक्ष**<br><br>**६०००.००**<br><br>**४२०.००**<br><br>**१२०.००** |
| **अंमलबजावणी निधी - एकूण** | **६५४०.००** |
| **सहाय्यक निधीमधून**<br>**सहाय्यक कामांवरील खर्च**<br>**अ)** तांत्रिक सेवा पुरवठादारामार्फत उपलब्ध करुन घ्यावयाच्या सहाय्यक सेवा (अद्यावत लेखाविषयक कामकाजाची व संगणक ज्ञानाची माहिती) प्रति जिल्हा रू. ०.१५ लक्ष/प्रति महिना<br>रू. ०.१५ लक्ष x १० कार्यालये x १२ महिने | **रूपये लक्ष**<br><br>**१८.००** |

| | |
|---|---|
| **ब) वाहन** (प्रती कार्यालय १ वाहन प्रत्येक महिन्यात कमाल ५ दिवसांकरीता)<br>रु. ०.०१ लक्ष प्रति वाहन प्रति दिन<br>रु. ०.०१ लक्ष x १० कार्यालये x ५ दिवस x १२ महिने | **६.००** |
| **क) आकस्मिक खर्च** प्रतिवर्ष<br>०.३० लक्ष x १० कार्यालये = | **३.००** |
| **सहाय्यक कामांवरील खर्च- एकूण** | **२७.००** |
| **अंमलबजावणी + सहाय्यक कामांवरील एकूण खर्च** | **६५९४.००** |

**टीप** :- अ) प्रतिवर्षी प्रति जिल्हा १०० ग्रामपंचायतींमध्ये अंमलबजावणीसाठी हा संभाव्य कार्यक्रम असेल. त्यापैकी

१) ५० ग्रामपंचायतींमध्ये DPR व अंमलबजावणी पूर्ण होणे अपेक्षित आहे.

२) उर्वरीत ५० ग्रामपंचायतींमध्ये केवळ DPR करणे अपेक्षित आहे.

ब) तांत्रिक सेवा पुरवठादारांसाठी एक दिवसाचे प्रशिक्षण हे WSSO कार्यक्रमाअंतर्गत देण्यात येईल.

क) जनजागृतीसाठी आवश्यक साहित्य तयार करणे व पर्जन्यमापक खरेदी करणे, यासाठी अंमलबजावणी निधीमधून खर्च करण्यात येईल.